**राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनेंतर्गत अर्थसहाय्य मंजूरीच्या प्रस्तावांबाबत निर्णय घेण्यासाठी प्रदत्त समिती गठीत करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन आदेश क्रमांक : रासनि १००९/२४०६७/प्र.क्र.११/पदुम-१४
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक : १८ सप्टेंबर, २००९

वाचा : शासनाचे समक्रमांकाचे, दिनाक ८.७.२००९ चे आदेश

**शासन आदेश :**

राष्ट्रीय सहकार विकास निगमकडे (एन.सी.डी.सी.) अर्थसहाय्य मंजूरीसाठी पाठवावयाच्या प्रस्तावांबाबतची निर्णय घेण्यासाठी शासनाच्या समक्रमांक, दिनांक ८.७.२००९ च्या आदेशान्वये सचिव(पदुम) यांचे अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली होती. सदर समिती रद्द करण्यात येऊन आता खालीलप्रमाणे प्रदत्त (Empowered Committee) समिती गठित करण्यात येत आहे -

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रधान सचिव ,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | : | अध्यक्ष |
| २) | प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | : | सदस्य |
| ३) | सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | : | सदस्य |
| ४) | आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | : | सदस्य |
| ५) | उपसचिव (मत्स्य), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | : | सदस्य |
| ६) | उपसंचालक (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई | : | सदस्य |
| ७) | उपनिबंधक, सहकारी संस्था (मत्स्य), मुंबई | : | सदस्य सचिव |

राष्ट्रीय सहकार विकास निगमकडून (एन.सी.डी.सी.) अर्थसहाय्य मिळणेबाबत आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचेकडून छाननी करुन प्राप्त झालेले प्रस्ताव उपरोक्त समितीपुढे योग्य त्या निर्णयासाठी ठेवण्यात येतील. सदर समितीच्या मान्यतेनंतर/शिफारशीनंतर सदरहू प्रस्ताव राष्ट्रीय सहकार विकास निगमकडे (एन्.सी.डी.सी.) पाठविण्याबाबत आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांना कळविण्यात येईल.

उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील-

१) राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेंतर्गत अर्थसहाय्य मंजूर करण्याकरीता मच्छिमार संस्थांचे प्रस्ताव रा.स.वि.नि.च्या अटी शर्तीनुसार अर्थसहाय्यासाठी पात्र आहेत किंवा कसे, हे ठरविणे

२) रा.स.वि.नि.कडे प्रस्ताव पाठविण्याबाबतचे निकष ठरविणे, संस्थेकडून कोणत्या प्रकारची माहिती/सादरीकरण घेणे योग्य आहे, याबाबत निर्णय घेणे,

३) संबंधित वर्षी मंजूर आर्थिक तरतूदीच्या योग्य त्या प्रमाणात प्रस्ताव राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांच्याकडे पाठविण्यास मान्यता देणे अथवा प्रस्ताव अमान्य करणे/प्रस्तावात फेरबदल सुचविणे,

४) यापूर्वी शासनामार्फत दिलेल्या आर्थिक सहाय्याचा संस्थानिहाय आढावा घेणे, शासनाला देय थकबाकीचा आढावा घेणे,

५) शासकीय भागभांडवल कसे कमी राहील याबाबतचे धोरण ठरविणे

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०९१९१४२३१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**( ज.ल.पावरा )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
उपसचिव (मत्स्य), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
उपसंचालक (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई
उपनिबंधक, सहकारी संस्था (मत्स्य), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई

प्रत,

कक्ष अधिकारी, पदुम-१२/पदुम-१३
निवडनस्ती